**राष्ट्रीय कृषि विकास योजना-रफ्तार योजनेंतर्गत सन २०२०-२१ करिता वितरीत केलेल्या निधीपैकी रु.६७.२६ कोटी निधीचे प्रकल्प निहाय वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासनन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: राकृवि १०२० /प्र.क्र. १४१/१४-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०४२

दिनांक : २४ सप्टेंबर, २०२१.

<u>संदर्भ :</u>

१. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. ७-१/२०२०- आरकेव्हीवाय, दि. १२/०५/२०२०
२. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०२० आरकेव्हीवाय/१, दि. ०९/१०/२०२०.
३. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०२० आरकेव्हीवाय/२, दि. ०९/१०/२०२०
४. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि १०२०/प्र.क्र.१४१/१४-अे, दि. २३/१०/२०२०.
५. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि १०२०/प्र.क्र.१४१/१४-अे, दि. ११/१२/२०२०
६. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. राकृवि १०२०/प्र.क्र.१४१/१४-अे, दि. ०५/०२/२०२१
७. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०२० आरकेव्हीवाय/१, दि. १२/०३/२०२१.
८. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि १०२०/प्र.क्र.१४१/१४-अे, दि. ३१/०३/२०२१
९. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि ११२०/प्र.क्र.१७८/१४-अे, दि. ३१/०३/२०२१
१०. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ०६/०४/२०२१.
११. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. ७-३/२०२१- आरकेव्हीवाय, दि. १५/०४/२०२१.
१२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि १०२०/प्र.क्र.१४१/१४-अे, दि.२७/०५/२०२१.
१३. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि ११२०/प्र.क्र.१७८/१४-अे, दि.२१/०६/२०२१
१४. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि १०२०/प्र.क्र.१४१/१४-अे, दि.२९/०६/२०२१.
१५. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि १०२०/प्र.क्र.१४१/१४-अे, दि.१२/०८/२०२१
१६. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/नियोजन/राकृवियो/निधी मागणी/३०००७, दि. १५/०९/२०२१.

**<u>प्रस्तावना :</u>**

राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार ही केंद्र पुरस्कृत योजना केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येते. सदर योजनेंतर्गत सन २०२०-२१ करिता केंद्र शासनाने महाराष्ट्रास सर्वसाधारण

प्रवर्गासाठी एकूण ₹ २९७.८९ कोटी निधी (केंद्र हिस्सा ₹ १७८.७४ कोटी + राज्य हिस्सा ₹ ११९.१५ कोटी) आणि अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रु.२०.०६ कोटी निधी (केंद्र हिस्सा ₹ १२.०४ कोटी + राज्य हिस्सा ₹ ८.०२ कोटी) संदर्भ क्र. २, ३ व ७ येथील पत्रांन्वये वितरीत केला आहे. सदर निधी संदर्भ क्र. ५,६,८ व ९ येथील शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि) यांना वितरीत केलेला आहे. या निधीपैकी सर्वसाधारण प्रवर्गाच्या ₹ २३३.५३ कोटी निधीचे व अनुसूचित जाती प्रवर्गाच्या रु. १७.१६ कोटी निधीचे प्रकल्पनिहाय वितरण यापूर्वीच केले असून दोन्ही प्रवर्गाच्या उर्वरित निधीचे प्रकल्पनिहाय वितरण करण्याबाबत कृषि आयुक्तालयाकडून संदर्भ क्र. १६ येथील पत्रान्वये प्रस्ताव प्राप्त झाला आहे.

कृषि आयुक्तालयाने सादर केलेल्या निधी मागणीच्या प्रस्तावानुसार सर्वसाधारण प्रवर्गाच्या व अनुसूचित जाती प्रवर्गाच्या उर्वरित निधीचे प्रकल्पनिहाय वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः**

**१.** सन २०२०-२१ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार या केंद्रपुरस्कृत योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी केंद्र व राज्याच्या ६०:४० अर्थसहाय्याच्या प्रमाणात प्राप्त निधीपैकी प्रकल्पनिहाय वितरण बाकी असलेला सर्वसाधारण प्रवर्गाचा रु.६४.३६ कोटी (रुपये चौसष्ट कोटी छत्तीस लाख फक्त) निधी व अनुसूचित जाती प्रवर्गाचा उर्वरित रु.२.९० कोटी (रुपये दोन कोटी नव्वद लाख फक्त) निधी अशा एकूण रु. ६७.२६ कोटी (रुपये सदुसष्ट कोटी सत्तावीस लाख फक्त) निधीचे प्रकल्प निहाय वितरण या शासन निर्णयान्वये करण्यात येत आहे. सदर वितरणाचा तपशिल सोबत जोडलेल्या **परिशिष्ट- अ** मध्ये दर्शविण्यात आला असून आयुक्त (कृषि) यांनी सदर निधी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेस उपलब्ध करुन द्यावा.

**२.** राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार या योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी उपलब्ध होणाऱ्या निधीचा प्रवर्गनिहाय विनियोग करताना दि.११/१२/२०२० रोजीच्या शासन निर्णयातील सूचना / कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२४११३३०२७९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सहपत्र :- परिशिष्ट - अ**

Shrikant
Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2021.09.24 11:35:13 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (पदुम व पणन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव (जलसंधारण), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. व्यवस्थापकीय संचालक (MSHMPB), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, गुलटेकडी, मार्केट यार्ड, पुणे
११. आयुक्त (पशुसंवर्धन), औंध, पुणे
१२. आयुक्त (दुग्धव्यवसाय), वरळी, मुंबई
१३. आयुक्त (मत्स्यव्यवसाय), मरीन ड्राईव्ह, मुंबई
१४. महासंचालक, महाराष्ट्र राज्य कृषि शिक्षण व संशोधन परिषद, भांबुर्डा, भोसले नगर, पुणे.
१५. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१६. संचालक (प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१७. संचालक (रेशीम), विभागीय आयुक्तालय परिसर, सिव्हील लाईन्स, नागपूर
१८. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, गुलटेकडी, मार्केट यार्ड, पुणे
१९. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
२०. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
२१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
२२. सहायक संचालकी (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
२३. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
२४. मा. मंत्री (कृषि व फलोत्पादन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२५. निवड नस्ती.

**परिशिष्ठ - अ**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

शाासन निर्णय क्र. राकृवि १०२० /प्र.क्र. १४१/१४-अे , दि. २४/०९/२०२१ चे सहपत्र

राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत प्रकल्प / अंमलबजावणी यंत्रणा निहाय रु. ६७.२६ कोटी निधीचे वितरण

**वर्ष - २०२०-२१** **(रक्कम रु. कोटीत)**

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्प मंजूरीचे वर्ष | एकूण प्रकल्प मुल्य | शिल्लक प्रकल्प किंमत / निधी | या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | सर्वसाधारण प्रवर्ग | अनुसूचित जाती प्रवर्ग | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ (६+७) |
| १. | कृषि जनजागृती कार्यक्रम | २०२१-२२ | ०.८७ | ०.८७ | ०.८७ | ०.०० | ०.८७ |
| २. | कृषि यांत्रिकीकरण प्रकल्प | २०२१-२२ | १५०.०० | १५०.०० | ३६.९९ | १.४० | ३८.३९ |
| **अ.** | **आयुक्त (कृषि)** | | **१५०.८७** | **१५०.८७** | **३७.८६** | **१.४०** | **३९.२६** |
| ३. | कांदाचाळ प्रकल्प | २०२१-२२ | १२५.०० | १२५.०० | २६.५० | १.५० | २८.०० |
| **ब.** | **व्यवस्थापकीय संचालक, मराफ आणि औ.व.मं.** | | **१२५.००** | **१२५.००** | **२६.५०** | **१.५०** | **२८.००** |
| **एकूण (अ+ब)** | | | **२७५.८७** | **२७५.८७** | **६४.३६** | **२.९०** | **६७.२६** |